वणी (खु.) लघु पाटबंधारे योजना , ता. दिंडोरी , जि. नाशिक, या योजनेस प्रथम सुधारित प्रशासकिय मान्यता प्रदान करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्रमांकः सुप्रमा- २०१४/(२७/२०१४)/ लपा-१
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: १३ जून, २०१८

संदर्भ-

१) शासन निर्णय क्र. लपायो/२००८/१५६६/(५३५/२००८)/खारभुमी मंत्रालय, मुंबई दि. २०.०५.२००९
२) गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महांमंडळ, औरंगाबाद यांचे पत्र क्र. जा. क्र. गोमपाविम/ तां-५/ वणी (खु.) लपाप्र/सुप्रमा/५४४, दिनांक १५/०१/२०१४
३) गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महांमंडळ, औरंगाबाद यांचे पत्र क्र. जा. क्र. गोमपाविम/ तां-५/ ३२१५, दिनांक ०४/०४/२०१६
४) वित्त विभाग ३२-मुंबई ,मंत्रालय ,यांचे पत्र क्रमांक: १) व्यअस-२०१८/प्र.क्र.२७/अर्थसं-२ दिनांक -२७.०२.२०१८.

प्रस्तावना :

वणी (खु.) लघु पाटबंधारे योजना , ता. दिंडोरी , जि. नाशिक, ही योजना नाशिक जिल्ह्यातील दिंडोरी तालुक्यातील वणी (खु.) गावाजवळील स्थानिक नाल्यावर असून सदर नाला कादवा नदीचा उपनाला आहे. या योजनेचे सिंचन क्षेत्र २५६ हेक्टर आहे. योजनेस संदर्भ क्र. १ अन्वये एकूण रु. ६४३.२१ लक्ष किंमतीस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. हा प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव तयार करतांना सन २००८-२००९ च्या दरसूचीप्रमाणे दर वापरण्यात आले होते. संदर्भ क्र. २ अन्वये योजनेचा रु. १५७१.२९ लक्ष किंमतीचा प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यतेसाठी प्रस्ताव सन २०१२-१३ दरसूचीनुसार शासनास सादर केला होता. शासनाने काढलेल्या शे-यांची पुर्तता अहवालासहीत प्रस्ताव संदर्भ क्र. ३ अन्वये शासनास पुनश्च सादर करण्यात आला. बांधकामाचे दरम्यान योजनेच्या खर्चात दरसूचीतील फरक, जास्त दराची निविदा स्वीकृती, भूसंपादन किंमतीतील झालेली वाढ, संकल्पचित्रातील बदल व इतर कारणांमुळे झालेली वाढ इत्यादी मुळे योजनेस प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणे आवश्यक झाले आहे. त्यासाठी सदर प्रस्ताव हा व्यय अग्रक्रम समितीपुढे मान्यतेसाठी ठेवण्यात आला होता. व्यय अग्रक्रम समितीने संदर्भ क्र. ४ अन्वये दि. १५.०२.२०१८ रोजी झालेल्या बैठकीत यास मान्यता दिलेली आहे.

## शासन निर्णय :

आता या निर्णयान्वये वणी (खु.) लघु पाटबंधारे योजना , ता. दिंडोरी , जि. नाशिक या योजनेस एकूण अंदाजित खर्च रुपये १८३३.९६ लक्ष (रु. एक हजार आठशे तेहत्तीस लक्ष शहाण्णव हजार फक्त ) या किंमतीकरिता प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. कामासाठी एकूण रूपये १७१९.६३ लक्ष व अनुषंगीक खर्च रूपये ११४.३३ लक्ष. अंदाजपत्रकात प्रत्यक्ष झालेला खर्च व उर्वरित कामासाठी सन २०१३-२०१४ वर्षाच्या दरसूचीप्रमाणे दर वापरण्यात आले आहेत. उपशीर्षवार तरतुदींचा गोषवारा सोबत परिशिष्ट “अ” मध्ये जोडला आहे.

२. या योजनेच्या कामावरील खर्च मागणी मुख्य लेखाशिर्ष,"४७०२ लहान पाटबंधारे यावरील भांडवली खर्च ८०- सर्वसाधारण, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (००) सार्वजनिक व इतर क्षेत्रातील गुंतवणुका (००) (०३) गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळास भागभांडवली अंशदान (४७०२ ४९२७)" या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व शासनाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ९५ /का-१४३४, दि.१०.०४.२०१७, तसेच वित्तविभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. २४५/व्यय-१२, दि.२७.१०.२०१७ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार व्यय अग्रक्रम समितीने दि. १५/०२/२०१८ रोजी संपन्न झालेल्या बैठकीत दिलेल्या मंजुरीनुसार व संदर्भ क्रमांक ४ नुसार याबाबतच्या निर्गमीत केलेल्या इतिवृत्तानुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

४. सदर प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधिन राहूने देण्यात येत आहे.

४.१ सदर सुधारित प्रशासकीय मान्यता म्हणजे प्रकल्प कार्यान्वयी करण्याच्या विविध टप्प्यावर झालेल्या अनियमिततेस मान्यता गृहीत धरता येणार नाही.

४.२ या प्रकल्पाबाबत चालु असलेल्या अथवा प्रस्तावित विभागिय चौकशीची कार्यवाही पुढे चालु ठेवावी. प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याच्या निर्णयामूळे विभागीय चौकशीच्या कार्यवाहीस कोणतीही बाधा पोहचणार नाही.

४.३ आर्थिक दायित्व निर्माण होईल अशा नवीन घटकांचा शासन मान्यतेशिवाय प्रकल्पात समावेश करण्यात येऊ नये.

४.४ प्रगतीपथावरील निविदांची कामे प्रधान्याने पूर्ण करण्यात यावीत. पाणीसाठ्याचा सिंचनाकरीता जास्तीत जास्त लाभ होईल अशा प्रकारे उर्वरित कामांचा प्राधान्यक्रम निश्चित करण्यात यावा व त्यानुसार कामे/ निविदा प्रक्रिया करण्यात यावी.

४.५ प्रकल्पाचे काम जून २०१९ पर्यंत पूर्ण करण्यात यावे.

या योजनेस प्रदान करण्यात आलेली प्रथम सुधारित प्रशासकिय मान्यता लपा कार्यासनाच्या प्रशासकीय मान्यतेच्या नोंदवहीमधे १७८ अनुक्रमांकावर नोंदविण्यात आली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६१३१७१४०१८८२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

सहपत्र :- परिशीष्ट - अ

Dharane Mallikarjun Irappa

Digitally signed by Dharane Mallikarjun Irappa
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=42153c779eba7d6ca17364b6d37857b105b20a01d36c767c7ed1d7d278837bd7, cn=Dharane Mallikarjun Irappa
Date: 2018.06.13 17:18:40 +05'30'

**( म.ई.धरणे)**

उपसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य मुंबई.

२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य.

३. सर्व मा. मंत्री /मा. राज्यमंत्री , महाराष्ट्र राज्य मंत्रालय मुंबई.

४. विरोधी पक्ष नेते विधान परिषद / विधानसभा

५. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.

६. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर.

७. वित्त विभाग (व्यय-१२), मंत्रालय, मुंबई ३२

८. नियोजन विभाग (कार्यासन १४३४), मंत्रालय, मुंबई ३२.

९. कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद

१०. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, उत्तर महाराष्ट्र प्रदेश,नाशिक

११. आंतर वित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

१२. जिल्हाधिकारी, नाशिक

१३. अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, ,अहमदनगर

१४. अर्थशाखा १/२ , जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई

१५. विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.

१६. लपा , संग्रहार्थ.

परिशीष्ट- “अ”

शासन निर्णय क्रमांकः सुप्रमा- २०१४/(२७/२०१४)/ लपा मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.तारीख: १३/६/२०१८ चे सहपत्र

वणी (खु.) लघु पाटबंधारे योजना , ता. दिंडोरी, जि. नाशिक या योजनेस प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता .

उपशिर्षनिहाय तरतूदी (रक्कम लक्ष मध्ये)

| अ.क्र. | तपशिल | प्र.मा. | प्रथम सुप्र.मा. | वाढीची रक्कम रु. लक्ष |
|---|---|---|---|---|
| १ | अ- प्राथमिक | ०.७५ | २.२१ | १.४६ |
| २ | ब- जमीन | ४२.२५ | ३४१.७६ | २९९.५१ |
| ३ | क- कामे, धरण, सांडवा | ४६७.५७ | ९१०.७० | ४४३.१३ |
| ४ | डी- विमोचक | २५.४५ | १३४.२२ | १०८.७७ |
| ५ | ई - प्रपात | ०.५ | - | (- ०.५०) |
| ६ | फ- आर एच टी कामे | ११.९० | - | (- ११.९० ) |
| ७ | जी - पुल | १.०० | ४१.४५ | ४०.४५ |
| ८ | एच - एस्केप | ५.५० | - | (- ५.५० ) |
| ९ | के- इमारती | १.५ | - | (- १.५०) |
| १० | एल - मातीकाम | २८.२१ | - | (- २८.२१) |
| ११ | एम - वृक्षारोपण | ०.१५ | १.७९ | १.६४ |
| १२ | ओ- संकिर्ण | ०.५५ | ०.६१ | ०.०६ |
| १३ | पी- परिरक्षण खर्च | ०.७५ | ४.८५ | ४.१० |
| १४ | आर- दळणवळण | १.५० | ०.५० | (- १.००) |
| १५ | अतिरिक्त स्वामीत्व धन | - | १३०.९२ | १३०.९२ |
| १६ | साठवण बंधारे | - | १५०.६१ | १५०.६१ |
| १७ | वितरिका | १.०० | - | (- १.००) |
| | **एकूण** | **५८८.५८** | **१७१९.६३** | ११३१.०४ |
| १८ | अनुषंगिक खर्च | ५४.६३ | ११४.३३ | ५९.७० |
| | **एकूण एकत्रित** | **६४३.२१** | **१८३३.९६** | **११९०.७४** |

( रु. एक हजार आठशे तेहत्तीस लक्ष शहाण्णव हजार फक्त )

**ठळक बाबी**

अ) या योजनेचे सिंचन क्षेत्र २५६ हेक्टर आहे.

ब) या योजनेमुळे एकूण होणारा पाणीसाठा १८९७.३१ स.घ.मी. आहे.

क) प्रति सहस्त्र घनमीटर पाणीसाठा किंमत रु. ९६,६६१/-

ड) लाभव्यय गुणोत्तर १.३२ > १

Dharane Mallikarjun Irappa

Digitally signed by Dharane Mallikarjun Irappa
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=42153c779eba7d6ca17364b6d37857b105b20a01d36c767c7ed1d7d278837bd7, cn=Dharane Mallikarjun Irappa
Date: 2018.06.13 17:18:52 +05'30'

**( म.ई.धरणे)**

उपसचिव, महाराष्ट्र शासन